अवर सचिव संवर्गातून उप सचिव संवर्गात तात्पुरती पदोन्नती.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः उसप- १३२३/प्र.क्र.१०२/प्रशा-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: ११ जून, २०२४.

## आदेश

अवर सचिव संवर्गातील खालील अधिकाऱ्यांना (गट-अ-वेतनश्रेणी एस २३-रू.६७७००-२०८७००) या आदेशाच्या दिनांकापासून उप सचिव (गट-अ-वेतनश्रेणी एस २५-रू.७८८००-२०९२००) या संवर्गात तात्पुरती पदोन्नती देण्यात येत असून त्यांची पदोन्नतीनंतरची पदस्थापना त्यांच्या नावासमोर स्तंभ ५ मध्ये दर्शविण्यात आलेल्या विभागामध्ये करण्यात येत आहे :

| अ.क्र. | अवर सचिवांचे नाव | प्रवर्ग | सध्याचा विभाग | उप सचिव पदावरील पदोन्नतीनंतरचा विभाग |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | श्री. दिपक बळीराम मोरे | खुला | सामान्य प्रशासन विभाग (प्रतिनि-मंत्रालय उपहारगृहे) | सामान्य प्रशासन विभाग |
| २ | श्रीमती नीला सुरेश रानडे | खुला | ग्राम विकास विभाग | ग्राम विकास विभाग |
| ३ | श्री.राजेंद्र तानाजीराव भालवणे | खुला | महिला व बाल विकास विभाग | गृह विभाग |
| ४ | श्री.जयसिंग शिवाजी रासकर | इमाव | पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग | पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग |
| ५ | श्री.रसिक अंबादास खडसे | अ.जा. | वित्त विभाग | सामान्य प्रशासन विभाग |
| ६ | श्री.रविंद्र रामदास पेटकर | अ.जा. | सामान्य प्रशासन विभाग | इतर मागास बहुजन कल्याण विभाग |
| ७ | श्री.अनिल कोंडाजी अहिरे | अ.जा. | सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग | वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग |
| ८ | श्री.सुदाम एकनाथ आंधळे | इमाव | सामान्य प्रशासन विभाग | सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग |
| ९ | श्री.महेश किसन वाव्हळ | खुला | पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग | पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग |
| १० | श्रीमती सीमा बबन जाधव | खुला | सामान्य प्रशासन विभाग | ग्राम विकास विभाग |
| ११ | श्री.सुनिल शंकर शिंदे | खुला | नियोजन विभाग | वित्त विभाग |

| अ.क्र. | अवर सचिवांचे नाव | प्रवर्ग | सध्याचा विभाग | उप सचिव पदावरील पदोन्नतीनंतरचा विभाग |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १२ | श्री.सुनिल रामचंद्र जोशी | खुला | सामान्य प्रशासन विभाग प्रतिनि-राज्य सेवा हक्क आयोग, नाशिक विभाग, नाशिक. | **प्रपत्र बढती** राज्य सेवा हक्क आयोग, नाशिक विभाग, नाशिक कार्यालयातील उप सचिव पदावर. |
| १३ | श्री.मिलिंद पद्मनाभ शेणॉय | खुला | अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक सरंक्षण विभाग | अल्पसंख्याक विकास विभाग |
| १४ | श्री. हेमंत सुधाकर डांगे | खुला | महसूल व वन विभाग | सामान्य प्रशासन विभाग |
| १५ | श्री. संतोष ज्ञानदेव देशमुख | खुला | सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग | सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग |
| १६ | श्रीमती मनिषा अनिल राणे | खुला | नियोजन विभाग | नियोजन विभाग |

२. श्री.सुनिल रा. जोशी यांना, महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियम ४०, परिशिष्ट-२, अट क्र.१८ नुसार तात्पुरत्या स्वरूपात प्रपत्र बढती (पदोन्नती) देण्यात येत आहे. सदर तरतुदीनुसार प्रपत्र बढतीचा कालावधी हा आदेशाच्या दिनांकापासून ६ महिन्यांचा राहील. त्यानंतर श्री.जोशी यांनी मंत्रालयीन विभागात हजर होणे आवश्यक राहील.

३. मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी याचिका क्र.२७९७/२०१५ मध्ये दि.४.८.२०१७ रोजी दिलेल्या निर्णयाविरोधात राज्य शासनाने मा.सर्वोच्च न्यायालयात विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ दाखल केली आहे. सदर याचिका अद्याप प्रलंबित आहे. सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन-१६-ब यांच्या शासन निर्णय दि.७.५.२०२१ मधील तरतुदीनुसार पदोन्नतीच्या कोट्यातील सर्व रिक्त पदे दि.२५.५.२००४ च्या स्थितीनुसार निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात सेवाज्येष्ठतेनुसार मा.सर्वोच्च न्यायालयाच्या निर्णयाच्या अधीन राहून भरण्यात येत आहेत.

४. सदर अधिकाऱ्यांना उप सचिव पदावरील तात्पुरती पदोन्नती खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

अ) ही पदोन्नती अत्यंत तात्पुरत्या स्वरूपात प्रशासकीय निकड म्हणून लोकहितास्तव देण्यात आली आहे.

आ) या तात्पुरत्या पदोन्नतीमुळे संबंधित अधिकाऱ्यांना नियमित पदोन्नतीचे म्हणजेच ज्येष्ठतेचे कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत.

इ) सदर तात्पुरती पदोन्नती प्रतिनियुक्तीवर बाहेर गेलेले अधिकारी रुजू होईपर्यंत किंवा पदोन्नतीच्या आदेशापासून ११ महिन्यासाठी यांपैकी जे आधी घडेल त्या कालावधीसाठी असेल.

ई) प्रतिनियुक्तीवर असलेले ज्येष्ठ अधिकारी यांचे प्रत्यावर्तन झाल्यानंतर त्यांच्यासाठी उप सचिव संवर्गात रिक्त पद उपलब्ध नसल्यास या आदेशातील कनिष्ठतम अधिकाऱ्याला पदावनत करण्याच्या अधीन राहून सदर तात्पुरत्या पदोन्नत्या देण्यात येत आहेत.

उ) सदर पदोन्नती मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७, कक्ष अधिकारी संवर्गांच्या ज्येष्ठतेबाबत मा.उच्च न्यायालयाने पारीत केलेल्या दि.०६.०८.२०१८ रोजीच्या आदेशाबाबत मा.सर्वोच्च न्यायालयात असलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२५१८१/२०१८ व त्यातील आय.ए. क्र.२५९०/२०१९ मध्ये होणाऱ्या निर्णयाच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

ऊ) सदर तात्पुरती पदोन्नती मा.उच्च न्यायालय, मुंबई येथील प्रलंबित असलेल्या रिट पिटीशन क्र.३३१०/२०२१ व रिट पिटीशन क्र.३३११/२०२१ यामधील आय.ए.क्र. १८५४२१/२०२१ व १८५५/२०२१ तसेच रिट पिटीशन क्र.३३१२/२०२१ मध्ये होणाऱ्या निर्णयाच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

ए) सदर तात्पुरती पदोन्नती मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे प्रलंबित अर्ज क्र.४८८/१७ (श्री.किरण जाधव व इतर) मध्ये होणाऱ्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

५. उप सचिव पदावर तात्पुरती पदोन्नती दिलेल्या अधिकाऱ्यांनी हे आदेश निघाल्याच्या तारखेपासून **तीस** दिवसामध्ये उप सचिव पदावर रुजू होणे आवश्यक आहे.

६. पदोन्नत अधिकाऱ्यांना संबंधित विभागांनी कार्यमुक्त केल्याबाबतच्या तसेच उप सचिव पदावर रूजू केल्याबाबतच्या आदेशांच्या प्रती या विभागास तात्काळ पाठवाव्यात.

७. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०६१११७५८२२८६०७ हा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VINAYAK BABURAO MANE

Digitally signed by VINAYAK BABURAO MANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT,
2.5.4.20=62086e8da42b80ce1e183d1e9775b63142b6a94941d6fa6ffe12c2ad5c605c23, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=174004518DCF8ACA2F592B0E3DB67D519F7D7899F46BEBFB7A9970706B2C9983, cn=VINAYAK BABURAO MANE
Date: 2024.06.11 18:11:50 +05'30'

**( वि.बा.माने )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन.
२. मा.मुख्यमंत्र्यांचे अ.मु.स./प्र.स./सचिव.
३. अ.मु.स. (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. अ.मु.स./प्रधान सचिव/सचिव, सर्व संबंधित मंत्रालयीन विभाग.
५. आयुक्त, राज्य सेवा हक्क आयोग, नाशिक विभाग, नाशिक.
६. सह /उप सचिव (आस्थापना), संबंधित मंत्रालयीन विभाग.
७. संबंधित अधिकारी (विभागामार्फत).
८. कक्ष अधिकारी (प्रशा-२), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. निवडनस्ती प्रशा-१